कुर्डुवाडी पंचायत समिती जि. सोलापूर प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१४/प्र.क्र. १६८/पंरा-७
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: ०३ डिसेंबर, २०१६

वाचा :- १) शासन निर्णय क्र. पंसई २०१२/ प्र.क्र. १२९/ पंरा-७ दि. २४.०१.२०१३
२) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांचे पत्र क्र.जिपसो/बांखा-१/प्रकल्प-४/१९८/२०१४ दि. २७.०६.२०१४ चे पत्र.

प्रस्तावना :-

१. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी संदर्भीय पत्रान्वये कुर्डुवाडी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे..

२. कुर्डुवाडी पंचायत समिती जि. सोलापूर नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास दिनांक २४.०१.२०१३ च्या शासन निर्णयान्वये रु. ३४७.५१ लक्ष इतक्या रक्कमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून प्रशासकीय मान्यते एवढा निधी जिल्हा परिषदेला वितरीत करण्यात आलेला आहे. कुर्डुवाडी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकाम पूर्ण झाले आहे. कुर्डुवाडी पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीकरीता अस्तित्वातील फर्निचर जुने व अपुरे असल्याने त्याठिकाणी नवीन फर्निचरची आवश्यकता आहे.

३. कुर्डुवाडी पंचायत समितीकरीता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम मंजूर करतेवेळी अंदाजपत्रकामध्ये फर्निचरची बाब अंतर्भूत करण्यात आलेली नव्हती. त्यामुळे त्या ठिकाणी नवीन अंतर्गत फर्निचर सुविधा निर्माण करण्याच्या दृष्टीने अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी रुपये ९९,७२,०००/- इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार करण्यात आले आहे..

४. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, कुर्डुवाडी पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत रुपये ९९,७२,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

५. कुर्डुवाडी (जि. सोलापूर) पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामांस एकूण रक्कम रुपये ९९,७२,०००/- (रुपये नव्व्याण्णव लक्ष बहात्तर हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) कुर्डुवाडी पंचायत समितीच्या ठिकाणी शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

६. कुर्डुवाडी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENRAL ABSTACT FOR KURDUWADI P.S. FURNITURE WORKS | | |
|---|---|---|
| Sr. | Description of item | Cost Rs. |
| 1 | Cost of Furniture | 9972000.00 |
| | Total Cost | 9972000.00 |

७. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६१२०३१२३७२८०३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6721aca60d5973c4d26547269488f4f9d7c98360213c1a8ca7eccc36b35448ff, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2016.12.03 12:50:57 +05'30'

( दि.बा पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त पुणे विभाग, पुणे
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर
५) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद सोलापूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा सोलापूर
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा पुणे विभाग, पुणे
११) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सोलापूर
१२) सभापती, पंचायत समिती, कुर्डुवाडी, जिल्हा सोलापूर
१३) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, कुर्डुवाडी, जिल्हा सोलापूर
१४) निवडनस्ती-पं.रा.७